**राज्यातील महानगरपालिका / नगरपरिषदांमध्ये अग्निशमन सेवेचे सक्षमीकरण करण्यासाठी महाराष्ट्र अग्निसुरक्षा अभियान राबविण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## नगर विकास विभाग

**शासन निर्णय क्रमांक अशस १४०७/३६०/प्र.क्र.२११/नवि-२०**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२. दिनांक : ३१ ऑगस्ट, २००९.**

**प्रस्तावना** :- केंद्रीय गृह मंत्रालयाच्या स्थायी अग्निशमन सल्लागार कौन्सिलने (Standing Fire Advisory Council i.e. SFAC) अग्निशमन सेवांबाबत मार्गदर्शक तत्वे (Compendium of Recommendations) स्वरुपात प्रसिध्द केली आहेत. नोव्हेंबर, १९७४ मध्ये झालेल्या परिषदेमध्ये या समितीने राज्यातील अग्निशमन सेवांचा विकास व विस्तार करण्यासाठी राज्य शासनाने नियमित स्वरुपात अर्थसंकल्पात तरतूद करण्याची शिफारस देखील केली आहे. सदर समितीच्या मार्गदर्शक तत्त्वानुसार संचालक, महाराष्ट्र अग्निशमन सेवा तथा अग्निशमन सल्लागार यांनी घेतलेल्या आढाव्यानुसार महाराष्ट्रातील बहुतांश महानगरपालिका / नगरपरिषदा / नगरपंचायतीच्या अग्निशमन सेवेत मोठया प्रमाणावर तुट आहे. राज्य शासनाने **महाराष्ट्र आग प्रतिबंधक व जीवसंरक्षक उपाययोजना अधिनियम, २००६**, दि.०६.१२.२००८ पासून पहिल्या टप्प्यात राज्यातील नागरी भागात व विशेष नियोजन प्राधिकरण क्षेत्रात लागू केला आहे. यासंबंधी **महाराष्ट्र आग प्रतिबंधक व जीवसंरक्षक उपाययोजना नियम, २००९**, दिनांक २३.०६.२००९ रोजी शासन राजपत्रात प्रसिध्द केले आहेत. या अधिनियम व नियमांतील तरतुदींची प्रभावीपणे अंमलबजावणी करण्यासाठी राज्यातील अग्निशमन सेवांचे बळकटीकरण व विस्तारीकरणाद्वारे अग्निशमन सेवेतील तूट भरुन काढण्यासाठी एक अभियान राबविण्याची व त्या अंतर्गत अग्निशमन सेवेतील तूट भरुन निघेपर्यंत नगर विकास विभागास उपलब्ध होणाऱ्या नियतव्ययात स्वतंत्र तरतूद करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत सर्वकष विचारांती शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय** :- महाराष्ट्रातील ड-वर्ग महानगरपालिका, नगरपरिषदा तसेच नगरपंचायती यांच्या अग्निशमन सेवेतील तुट भरुन काढण्याकरिता व राज्यातील अग्निशमन सेवेचे सक्षमीकरण करण्याकरिता विविध आवश्यक उपाययोजना करण्याच्या दृष्टीने **"महाराष्ट्र अग्निसुरक्षा अभियान"** राबविण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. या अभियानांतर्गत खालील बाबींना प्राधान्य देण्याचे ठरविण्यात आले आहे:-

(I) **अग्निशमन सेवांशी निगडीत पायभुत सुविधांचे बळकटीकरण करणे.**

(II) **अग्निशमन सेवेतील कार्यरत मनुष्यबळाचे सक्षमीकरण करणे.**

(III) **महाराष्ट्र आग प्रतिबंधक व जीवसंरक्षक उपाययोजना अधिनियम, २००६ च्या तरतुदींविषयी व आग प्रतिबंधक व जीवसंरक्षक उपाययोजनांविषयी जन शिक्षण व जन जागृती निर्माण करणे.**

ज्याअर्थी शासनाने सद्यस्थितीत **महाराष्ट्र आग प्रतिबंधक व जीवसंरक्षक उपाययोजना अधिनियम, २००६** हा फक्त नागरी भागात व विशेष नियोजन प्राधिकरणांच्या क्षेत्रात लागू केला आहे, त्याअर्थी **"महाराष्ट्र अग्निसुरक्षा अभियान" हे** प्रथम नागरी भाग व विशेष नियोजन प्राधिकरण क्षेत्रात राबविण्यात येईल व त्या अंतर्गत नागरी स्थानिक स्वराज्य संस्था व विशेष नियोजन प्राधिकरणे यांच्या क्षेत्रातील अग्निशमन सेवेचे बळकटीकरण व सक्षमीकरण, राज्य अग्निशमन अकादमी व नवनिर्मित अग्निशमन सेवा संचालनालयाचे बळकटीकरण तसेच अग्निशमन मनुष्यबळाचे सक्षमीकरण व आग प्रतिबंधक व जीवसंरक्षक उपाययोजनांविषयी जन जागृती या प्रमुख बाबीं राबविण्यात येतील. नागरी भागात व विशेष नियोजन प्राधिकरणांच्या क्षेत्रात सदर अभियान राबविल्यानंतर राज्यातील उर्वरीत भागात सदर अभियानाची व्याप्ती वाढविण्याबाबत शासन विचार करेल.

सद्यस्थितीत **"महाराष्ट्र अग्निसुरक्षा अभियान"** अंतर्गत नागरी भागात अग्निशमन सेवेशी निगडीत पायाभुत सुविधांचे बळकटीकरण, अग्निशमन केंद्रे बांधणे, अग्निशमन वाहने उपलब्ध करुन देणे, राज्य अग्निशमन अकादमीचे बांधकाम पूर्ण करणे, प्रगत अग्निशमन अकादमीचे बांधकाम करणे, इत्यादि बाबींची अंमलबजावणी करण्यात येईल. त्या बाबतचा तपशील पुढीलप्रमाणे आहे :-

**(I) अग्निशमन सेवांशी निगडीत पायाभुत सुविधांचे बळकटीकरण करणे:-**

प्रस्तुत अभियानांतर्गत अग्निशमन सेवांच्या बळकटीकरणासाठी व सक्षमीकरणासाठी खालील उपाययोजना राबविण्यात येतील.

**(अ) स्थानिक स्वराज्य संस्थांमध्ये अग्निशमन केंद्रांची उभारणी व अग्निशमन यंत्रसामुग्रीची खरेदी:-**

(i) राज्यातील ड-वर्ग महानगरपालिका / नगरपरिषदा व नगरपंचायती यांना शासनाने विहित केलेल्या मानकानुसार अग्निशमन केंद्रांची उभारणी करण्यासाठी व अग्निशमन वाहने (अनुषंगिक यंत्रसामुग्रीसह) उपलब्ध करुन देण्याच्या दृष्टीने त्यांना खालील सूत्राप्रमाणे वित्तीय अनुदान देण्यात येईल.

| अ. क्र. | महानगरपालिका / नगरपरिषदा / नगरपंचायती | शासन अनुदानाची टक्केवारी | महानगरपालिका / नगर परिषदांच्या हिश्याची टक्केवारी |
|---|---|---|---|
| १ | महानगरपालिका - ड वर्ग | ३५ % | ६५ % |
| २ | नगरपरिषदा - अ वर्ग | ५० % | ५० % |
| ३ | नगरपरिषदा - ब वर्ग | ७० % | ३० % |
| ४ | नगरपरिषदा - क वर्ग | ८० % | २० % |
| ५ | नगर पंचायत | ८० % | २० % |

"अ", "ब" व "क" वर्ग महानगरपालिका या आर्थिकदृष्टया तुलनेने अधिक सक्षम असल्यामुळे त्यांनी स्वनिधीतून व महाराष्ट्र आग प्रतिबंधक व जीवसंरक्षक उपाययोजना अधिनियम, २००६ चे कलम २५(३) नुसार अग्निसुरक्षा निधीतून त्यांच्या अग्निशमन व्यवस्थेचे सक्षमीकरण करावयाचे आहे.

(ii) या योजनेअंतर्गत संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी त्यांच्या हिश्याची रक्कम केंद्रीय वित्त आयोगाच्या शिफारशीप्रमाणे त्यांना प्राप्त होणा-या अनुदानातून तसेच महाराष्ट्र आग प्रतिबंधक व जीवसंरक्षक उपाययोजना अधिनियम, २००६ चे कलम २५(३) नुसार निर्माण करण्यात येणाऱ्या **"आग सुरक्षा निधी"** मध्ये जमा होणाऱ्या रकमेमधून किंवा स्वतःच्या निधीतून द्यावयाची आहे.

(iii) नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांच्या कार्यक्षेत्रात **"महाराष्ट्र अग्निसुरक्षा अभियान"** अंतर्गत अग्निशमन वाहने व अग्निशमन केंद्र बांधणे यांच्याकरिता अर्थसहाय्य देण्याकरिता खालीलप्रमाणे प्राथम्यक्रम राहील:-

- **प्राथम्य-१** अंतर्गत ज्या ९१ "ब" वर्ग व "क" वर्ग नगरपरिषदांमध्ये अग्निशमन सेवा नाहीत त्या नगरपरिषदांना एक अग्निशमन वाहन (सर्व उपकरणासह) व एक अग्निशमन स्थानक प्रथम प्राधान्याने पुरविण्याच्या दृष्टीने वरील सूत्राप्रमाणे अर्थसहाय्य उपलब्ध करुन देण्यात येईल. याबाबतचा संभाव्य खर्च व अनुज्ञेय अनुदानाचा तपशील **परिशिष्ट-अ** मध्ये दिलेला आहे.

- **प्राथम्य-२** अंतर्गत १०९ "अ", "ब" व "क" वर्ग नगरपरिषदांना अग्निशमन केंद्रांचे बांधकाम करण्यासाठी व ४२ नगरपरिषदांना अग्निशमन वाहने (सर्व उपकरणासह) खरेदी करण्यासाठी वरील सूत्राप्रमाणे अर्थसहाय्य उपलब्ध करुन देण्यात येईल. याबाबतचा संभाव्य खर्च व अनुज्ञेय अनुदानाचा तपशील **परिशिष्ट-ब** मध्ये दिलेला आहे.

- **प्राथम्य-३** अंतर्गत ज्या ड-वर्ग महानगरपालिका / नगरपरिषदांकडे अग्निशमन यंत्रणा आहे परंतु तूटीच्या विश्लेषणानुसार अग्निशमन सेवेत काही प्रमाणात तूट आहे अशा 'ड' वर्ग महानगरपालिका व नगरपरिषदांना उर्वरीत अग्निशमन केंद्रे बांधणे व अग्निशमन वाहने (सर्व उपकरणासह) उपलब्ध करुन देण्यासाठी वरील सूत्राप्रमाणे अर्थसहाय्य उपलब्ध करुन देण्यात येईल. याबाबतचा संभाव्य खर्च व अनुज्ञेय अनुदानाचा तपशील **परिशिष्ट-क** मध्ये दिलेला आहे.

(iv) सर्वसाधारणपणे महानगरपालिका/नगरपालिका/नगरपंचायती यांच्यासाठी अग्निशमन केंद्राचे प्रकार (Types) खालीलप्रमाणे विहित करण्यात येत आहेत :-

| अ. क्र. | महानगरपालिका/ नगरपरिषदा | मुख्य अग्निशमन केंद्र | विभागीय अग्निशमन केंद्र | उप अग्निशमन केंद्र |
|---|---|---|---|---|
| १ | ड-वर्ग महानगरपालिका | अग्निशमन केंद्र प्रकार: FS-I / FS-II | अग्निशमन केंद्र प्रकार: FS-III | अग्निशमन केंद्र प्रकार: FS-IV |
| २ | अ-वर्ग नगरपरिषदा | अग्निशमन केंद्र प्रकार: FS-II | -- | अग्निशमन केंद्र प्रकार: FS-IV |
| ३ | ब-वर्ग नगरपरिषदा | अग्निशमन केंद्र प्रकार: FS-III | -- | -- |
| ४ | क-वर्ग नगरपरिषदा / नगरपंचायती | अग्निशमन केंद्र प्रकार: FS-IV | -- | -- |

वरोल्लेखित विविध प्रकारच्या अग्निशमन केंद्रांचा तपशील **परिशिष्ट-ड (भाग-१)** मध्ये देण्यात आला आहे. अग्निशमन केंद्रे बांधताना भविष्यातील अपेक्षित अग्निशमन केंद्राच्या होणा-या विस्ताराच्या अनुषंगाने आवश्यक तेवढा भूखंड राखून ठेवण्याची दक्षता सर्वसंबंधितांनी घ्यावी.

(v) या योजनेअंतर्गत निधी वितरीत करण्याबाबतच्या अटी व शर्ती पुढीलप्रमाणे राहतील :-

(१) ज्या महानगरपालिका / नगरपरिषदा / नगरपंचायती यांना या योजनेअंतर्गत वरील टक्केवारीनुसार अनुदान देय होईल त्या महानगरपालिका / नगरपरिषदा व नगरपंचायती यांना आपल्या कार्यक्षेत्रात कोणत्याही आपत्कालीन स्थितीत अग्निशमन सेवा देणे बंधनकारक असेल. तसेच त्यांना त्यांच्या कार्यक्षेत्राबाहेर सुमारे २० चौ. कि.मी. परिसरात अग्निशमन सेवा देणे बंधनकारक असेल. अशाप्रकारचे हमीपत्र त्यांचेकडून घेतल्यानंतरच त्यांना योजनेअंतर्गत निधी मंजूर करुन देण्यात येईल. तथापि वाणिज्य व औद्योगिक आस्थापना यांचेकडून अग्निशमन सेवा शुल्क आकारण्याची त्यांना परवानगी राहील. अग्निशमन सेवा शुल्काचे दर शासनाकडून स्वतंत्रपणे मंजूर करण्यात येतील.

रा न-१५६४ -२अ

(२) नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी महाराष्ट्र आग प्रतिबंधक व जीवसंरक्षक उपाययोजना अधिनियम, २००६, मधील अनुसूची-दोन मधील भाग-एक व दोन नुसार फी आकारणे बंधनकारक आहे.

(३) राज्यातील सर्व नागरी स्थानिक स्वराज्य संस्था तसेच विशेष नियोजन प्राधिकरणे यांची लोकसंख्या तसेच औद्योगिक क्षेत्रातील आगीचे धोके या सर्व बाबींचा विचार करुन अग्निशमन केंद्रासाठी आदर्श कर्मचारी आकृतीबंध **परिशिष्ट-ड (भाग-२)** प्रमाणे असेल व सदर आकृतीबंधाला अधीन राहून अग्निशमन केंद्र अथवा वाहने ज्या प्रमाणात वाढतील त्या प्रमाणात (Pro-rata Basis, in accordance with category of Fire Station and number of Fire Vehicles) पदे मंजूर करण्यासाठी संचालक, महाराष्ट्र अग्निशमन सेवा यांच्या शिफारशीसह प्रस्ताव शासनाकडे सादर केल्यानंतर शासनाच्या मंजुरीने पद निर्मितीस मान्यता देण्यात येईल. मात्र ज्या नगरपरिषदांच्या क्षेत्रात नैसर्गिक आपत्ती अथवा तीर्थक्षेत्र आहेत त्यांच्या बाबतीत परिस्थिती व आवश्यकतेनुसार कर्मचारी वर्गात बदल मंजूर करुन त्या ठिकाणी अतिरीक्त कर्मचारी वर्ग नियुक्त करण्याबाबत शासनाकडून गुणवत्तेनुसार विचार करण्यात येईल.

अग्निशमन सेवा संवर्गासाठी सेवा प्रवेश नियम (Recruitment Rules) शासनाकडून प्रसिध्द केले जातील व त्याप्रमाणे नियुक्ती करणे बंधनकारक असेल.

आगीच्या घटना व आपत्कालीन परिस्थिती कोणत्याही क्षणी निर्माण होत असल्याने सदर घटनांना समर्थपणे तोंड देण्यासाठी अग्निशमन केंद्रामध्ये किमान कर्मचारी वर्ग २४ तास तैनात राहील याबाबतची कार्यवाही संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्था व विशेष नियोजन प्राधिकरणे यांनी करावी.

केंद्र शासनाच्या मार्गदर्शक तत्वानुसार महानगरपालिका / नगरपरिषदा व नगरपंचायती यांनी प्रत्येक पाळीसाठी ८ तास कर्तव्यकाळ ठरवून त्यानुसार कर्मचारी वृंदाची नियुक्ती करावयाची आहे.

(४) ड-वर्ग महानगरपालिकांनी अग्निशमन दलासाठी आवश्यक तो अधिकारी / कर्मचारी वर्ग नियुक्त करण्यासाठी येणारा खर्च स्वतःच्या निधीमधून भागवावयाचा आहे. तसेच नगरपरिषदांनाही अग्निशमन दलात आवश्यक अधिकारी/कर्मचारी वर्ग नियुक्त करण्यासाठी या अभियानांतर्गत कोणतेही अर्थसहाय्य देण्यात येणार नाही.

(५) संचालक, महाराष्ट्र अग्निशमन सेवा, यांच्याकडून शासन मान्यतेने महानगरपालिका / नगरपरिषदा / नगरपंचायती व विशेष नियोजन प्राधिकरणे यांच्यासाठी आवश्यक अग्निशमन वाहने, रेक्स्यु वाहने, उंच शिड्या, व इतर रेक्स्यु उपकरणे व सयंत्रे यांचा दर्जा व तपशील विहित करण्यात येईल.

(६) अग्निशमन वाहने / सह उपकरणे खरेदी करण्यासाठी शासनामार्फत संचालक, महाराष्ट्र अग्निशमन सेवा यांच्या अध्यक्षतेखाली नियुक्त केलेल्या तांत्रिक समितीच्या मदतीने वेळोवेळी शासन स्तरावरुन दरकरार निश्चित करुन देण्यात येईल. त्यानुसार अग्निशमन वाहने / उपकरणे नागरी स्थानिक स्वराज्य संस्था व विशेष नियोजन प्राधिकरणे अथवा इतर शासकीय विभाग / उपक्रम खरेदी करु शकतील.

(७) अग्निशमन वाहनांसाठी निश्चित केलेला कलर कोड असलेल्या अग्निशमन वाहनांचा वापर केवळ अग्निशमन सेवेसाठीच करण्यात येईल. अन्य कामासाठी या वाहनांचा वापर केला जाणार नाही याची खबरदारी संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्था अथवा विशेष नियोजन प्राधिकरण यांनी घेणे त्यांना बंधनकारक असेल.

**(ब) विशेष नियोजन प्राधिकरणे यांच्या अंतर्गत अग्निशमन व्यवस्थेचे सक्षमीकरण:-**

विशेष नियोजन प्राधिकरणांनी त्यांच्या परिक्षेत्रात महाराष्ट्र आग प्रतिबंधक व जीवसंरक्षक उपाययोजना अधिनियम, २००६ प्रमाणे त्यांच्या परिक्षेत्रात सेवा देणे बंधनकारक असून त्यांनी या अधिनियमाच्या कलम २५(३) मधील तरतुदींप्रमाणे **"अग्नि सुरक्षा निधी"** निर्माण करुन त्याप्रमाणे अग्निशमन सेवा आर्थिकदृष्ट्या स्वयंपूर्ण होण्यासाठी योग्य ती अग्निशमन सेवा फी लावावी. सर्व विशेष नियोजन प्राधिकरणांना त्यांच्या अखत्यारीतील क्षेत्रात अग्निशमन सेवा देणे बंधनकारक आहे. सर्वसाधारणपणे ज्या भूभागातील विकास कामाचे आराखडे मंजूर करण्याचे अधिकार ज्या नियोजन प्राधिकरणास महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगररचना अधिनियम, १९६६ प्रमाणे प्रदान करण्यात येतील त्या भूभागासाठी आग प्रतिबंधक उपाययोजनांची अंमलबजावणी करणे व अग्निशमन सेवा कार्यान्वित करुन सेवा उपलब्ध करण्याची जबाबदारी संबंधित विशेष नियोजन प्राधिकरणाची असेल. मात्र शासनाच्या मान्यतेने ही जबाबदारी निकटवर्ती नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेकडे सुपुर्द करता येईल.

**(II) <u>अग्निशमन सेवेतील कार्यरत मनुष्यबळाचे सक्षमीकरण (Capacity Building):-</u>**

महाराष्ट्र आग प्रतिबंधक व जीवसंरक्षक उपाययोजना अधिनियम, २००६ हा कायदा दिनांक ०६ डिसेंबर, २००८ पासून राज्यातील नागरी भागात व विशेष नियोजन प्राधिकरणाच्या क्षेत्रात लागू झाला आहे. हा कायदा लागू झाल्यावर अनेक बाबी हाताळण्यासंबंधी नागरी स्थानिक स्वराज्य संस्था आणि विशेष नियोजन प्राधिकरणे यांची जबाबदारी वाढली आहे. सदर जबाबदारी ही कायदेशीर असून, या कामी जी यंत्रणा व मनुष्यबळ कार्यरत आहे त्यांचे सक्षमीकरण करण्याचे काम अग्निशमन सेवा संचालनालयामार्फत करण्यात येईल. या संचालनालयामार्फत नागरी स्थानिक स्वराज्य संस्था व विशेष नियोजन प्राधिकरणे यांचे अधिकारी/कर्मचारी यांना तसेच अग्निशमन सेवा संचालनालयामध्ये कार्यरत असणा-या मनुष्यबळास प्रशिक्षण देणे आवश्यक आहे. औद्योगिक क्षेत्राचा झपाट्याने होत असलल्या विकासामुळे रासायनिक व ज्वालाग्राही पदार्थांमुळे आगीचे धोके वाढलेले आहे. त्यासाठी त्या

बाबतचे प्रशिक्षण नागरी स्थानिक स्वराज्य संस्था आणि विशेष नियोजन प्राधिकरणे यांना देण्यासाठी राज्य अग्निशमन अकादमीचे बळकटीकरण होणे ही काळाची गरज आहे. त्यासाठी खालीलप्रमाणे उपाययोजना करण्यात येत आहेत.

(अ) **राज्य अग्निशमन अकादमी प्रस्थापित करणेः-** विद्यानगरी, सांताक्रूझ-पूर्व, मुंबई-९८ येथील राज्य अग्निशमन प्रशिक्षण केंद्राचा विस्तार करुन त्याठिकाणी आठ मजली **राज्य अग्निशमन अकादमी** प्रस्थापित करण्यास शासनाने मान्यता दिली असून हे काम मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाकडे डिपॉझिट कॉन्ट्रीब्युशन तत्वावर सुपुर्द करण्यात आले असून या बांधकामासाठी अंदाजे **रु.२३.०० कोटी** खर्च अपेक्षित असून सदर खर्च १२ व्या वित्तीय आयोगाकडून राज्यास प्राप्त होणाऱ्या निधीतून भागवावयाचा आहे. सदर अकादमीमध्ये उपकरणे व यंत्रसामुग्री खरेदी करण्याकरिता **रु.६.०० कोटी** अनुदान **"महाराष्ट्र अग्निसुरक्षा अभियान"** अंतर्गत संचालक, महाराष्ट्र अग्निशमन सेवा यांना उपलब्ध करुन देण्यात येईल.

(ब) **प्रगत अग्निशमन अकादमी प्रस्थापित करणेः-** आपत्कालीन व्यवस्थापनात अग्निशमन सेवा हा महत्वाचा व अविभाज्य भाग आहे. नैसर्गिक आपत्ती, रासायनिक आगी, उंच इमारतीच्या आगी, रेल्वे दुर्घटना, विमान अपघात अशाप्रकारच्या दुर्घटनेत अग्निशमन व विमोचनाचे कार्य कसे करावे याबाबत कॉम्प्रेस्ड एअर ब्रिथिंग ॲपरेट्स व ट्रेनिंग गॅलरी, यांच्या माध्यमातून प्रत्यक्ष प्रशिक्षण देणे तसेच अशा प्रकारच्या सुविधा उपलब्ध करण्यासाठी प्रगत आंतरराष्ट्रीय शहरातील अग्निशमन अकादमीच्या धर्तीवर हॉट फायर ड्रिल, सिम्युलेटर, रेस्क्यू ऑपरेशन इत्यादि सुविधांचे प्रशिक्षण देणे ही काळाची गरज आहे. तथापि, अशा प्रकारचे प्रशिक्षण देण्यासाठी जवळपास ५० एकर जागेची आवश्यकता असून अशी जागा संचालकांनी शासनाच्या मान्यतेने ठरवावी व त्यासाठी अनुदानाचा प्रस्ताव शासन मान्यतेस्तव सादर करावा. सदर प्रगत अग्निशमन अकादमीकरिता या अभियानांतर्गत रु.५०.०० कोटीची तरतूद करण्यात येत आहे.

या पध्दतीने राज्य अग्निशमन प्रशिक्षण अकादमी व प्रगत अग्निशमन अकादमीसाठी महाराष्ट्र अग्निसुरक्षा अभियान अंतर्गत खालीलप्रमाणे अनुदान उपलब्ध करुन देण्यात येईल.

**(रु.कोटीमध्ये)**

| अ.क्र | बाब | महाराष्ट्र अग्निसुरक्षा अभियानांतर्गत अनुज्ञेय अनुदान |
|---|---|---|
| १ | राज्य अग्निशमन प्रशिक्षण अकादमी | ६.०० |
| २ | प्रगत अग्निशमन अकादमी (टप्पा-I) | २५.०० |
| ३ | प्रगत अग्निशमन अकादमी (टप्पा-II) | २५.०० |
| | **एकूण** | **५६.००** |

## (III) जन-शिक्षण व जन-जागृती (Mass Education & Public Awareness)

महाराष्ट्र आग प्रतिबंधक व जीवसंरक्षक अधिनियम, २००६ हा नागरी स्थानिक स्वराज्य संस्था व विशेष नियोजन प्राधिकरण क्षेत्रात लागू झाला असल्याने नागरी भागातील स्थानिक स्वराज्य संस्थांनी या कायद्याच्या तरतुदीविषयी जनतेमध्ये विविध स्तरांवर व्याख्याने, चर्चासत्रे, कार्यशाळा व परिषदा आयोजित करुन या कायद्याबाबतची माहिती सर्वसामान्य जनतेस उपलब्ध करुन दिली पाहिजे. यासाठी रेडिओ, दूरदर्शन, केबल इ. माध्यमांचा वापर करणे आवश्यक राहील.

वरीलप्रमाणे जन जागृतीची कार्यवाही नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी तसेच विशेष नियोजन प्राधिकरणांनी त्यांच्या स्तरावर करणे अपेक्षित असले तरी प्रसिध्दी व प्रशिक्षणाच्या सामाईक सामुग्री विकसित करण्यासाठी संचालक, महाराष्ट्र अग्निशमन व आणीबाणी सेवा तथा अग्निशमन सल्लागार यांनी शासनाच्या मान्यतेने कार्यवाही करावी.

## (IV) "महाराष्ट्र अग्निसुरक्षा अभियान" यासाठी वित्तीय व्यवस्थाः-

(i) "महाराष्ट्र अग्निसुरक्षा अभियान" राबविण्याकरिता शासनाकडून द्यावयाचा अनुदानाचा हिस्सा अग्निशमन सेवेची तूट भरुन निघेपर्यंत नगर विकास विभागाच्या नियतव्ययातून दरवर्षी अर्थसंकल्पीत करुन उपलब्ध करुन देण्यात येईल. याकरिता राज्यस्तरावर खालीलप्रमाणे स्वतंत्र लेखाशिर्ष उघडण्यात आले आहे:-

"मागणी क्र.एफ-२
मुख्य लेखाशिर्ष-२२१७ नगर विकास
८०-सर्वसाधारण
१९१- स्थानिक संस्था, महानगरपालिका, नगर विकास प्राधिकरणे, नगर सुधार मंडळे
इत्यादिंना सहाय्य.
पंचवार्षिक योजनेअंतर्गत योजना. ३१ सहायक अनुदान
(००)(५३) अग्निशमन सेवा व आणीबाणींच्या सेवांच्या बळकटीकरणासाठी
सहायक अनुदान (२२१७-३२१५)".

(ii) या व्यतिरीक्त दरवर्षी जिल्हा योजनेअंतर्गत उपलब्ध एकूण नियतव्ययातूनही या अभियानांतर्गत उपाययोजनांकरिता काही तरतूद संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना उपलब्ध व्हावी यासाठी जिल्हा योजनेअंतर्गतही वरील अभियानासाठी आवश्यक लेखाशिर्ष उघडण्यात येईल. त्याबाबतचे आदेश स्वतंत्रणे निर्गमित करण्यात येतील.

(iii) या अभियानांतर्गत अनुज्ञेय बाबींकरिता शासकीय अनुदानाच्या हिश्यापोटी वैधानिक विकास महामंडळाकडूनही संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांच्या मागणीप्रमाणे निधी उपलब्ध करुन देणे अनुज्ञेय राहील.

हे आदेश नियोजन विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र.८८/१४४४, दिनांक ०६.०८.२००९ अन्वये व वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र.२६६/०९/व्यय-३, दिनांक ११.०८.२००९ अन्वये प्राप्त अभिप्राय विचारात घेवून निर्गमित करण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.**

31/8/2009
**(मनु कुमार श्रीवास्तव)**
**सचिव**
**नगर विकास विभाग**

सहपत्र : परिशिष्ट - अ, ब, क, ड (भाग-१ व २).

**प्रति,**
मा.मुख्यमंत्र्यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
मा.राज्यमंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
मा.मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
प्रधान सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
सचिव-२, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
प्रधान सचिव (उद्योग ऊर्जा व कामगार), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
प्रधान सचिव, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
महालेखापाल, मुंबई - १ (लेखा व हक्कदारी), महाराष्ट्र, मुंबई
महालेखापाल, मुंबई - १ (लेखा व परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई
संचालक,महाराष्ट्र अग्निशमन व आणीबाणी सेवा तथा अग्निशमन सल्लागार,म.रा., मुंबई
आयुक्त, सर्व महानगरपालिका,
महानगर आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, वान्द्रे (पू), मुंबई-४०० ०५१
[redacted]
मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, अंधेरी(पू), मुंबई-४०० ०९३
संचालक, नगरपालिका प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई-४०० ०१८.
सर्व मुख्याधिकारी, नगरपरिषद / नगरपंचायती,
व्यवस्थापकीय संचालक, सिडको, "निर्मल",नरीमन पॉईट, मुंबई-४०० ०२१.
संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई
(दोन प्रती प्रसिध्दीकरिता)
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

एच-१५६४[ ६००-९-०९]-५

निवासी लेखापरिक्षा अधिकारी, **मुंबई**
सर्व विभागीय आयुक्त तथा प्रादेशिक संचालक, नगरपालिका प्रशासन,
सर्व जिल्हाधिकारी,
नियोजन / वित्त विभाग,
सर्व मंत्रालयीन विभाग,
नगर विकास विभागातील सर्व कार्यासने
नगर विकास विभाग / का. २९ (महाराष्ट्र शासनाच्या संकेत स्थळावर प्रसिध्दीकरिता)
संचालक, महाराष्ट्र अग्निशमन सेवा यांच्या कार्यालयाच्या **www.maharashtrafireservices.org** या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात यावी.

## परिशिष्ट-अ

राज्य अग्निशमन अकादमी व तूटीच्या विश्लेषणानुसार ज्या नगरपरिषदा/नगरपंचायती यांच्याकडे अग्निशमन केंद्र व अग्निशमन वाहने उपलब्ध नाहीत त्यासाठी येणारा संभाव्य खर्च

प्राथम्य - १

(रुपये कोटीमध्ये)

| अ. क्र. | नगरपरिषदा | जिल्हा | वर्ग | क्षेत्रफळ चौ. कि.मी. | लोकसंख्या | अग्निशमन केंद्रे (क्षेत्रफळावर आधारीत) | | | अग्निशमन वाहन (लोकसंख्येवर आधारीत) | | | .अभियानांतर्गत मंजूरीस पात्र अग्निशमन केंद्रे (प्रकारासह) व वाहने | | | .अग्निशमन केंद्राचा खर्च | .अग्निशमन वाहनांचा खर्च | एकूण खर्च |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | | अनुज्ञेय | उपलब्ध | तूट | अनुज्ञेय | उपलब्ध | तूट | केंद्राचा प्रकार | केंद्र | वाहने | | | |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ | १३ | १४ | १५ | १६ | १७ | १८ |
| | राज्य अग्निशमन प्रशिक्षण अकादमी | | | | | | | | | | | | | | ६.०० | ०.०० | ६.०० |
| | एकूण | | | | | | | | | | | | | | ६.०० | ०.०० | ६.०० |
| | | | | | | | | | | | | | | | | | |
| १ | डहाणू | ठाणे | ब | १८.२० | ४४४०१ | १ | ० | १ | १ | ० | १ | 1 x FS - IV | १ | १ | ०.५० | ०.३० | ०.८० |
| २ | पालघर | ठाणे | ब | ६४.०८ | ५२६७७ | १ | ० | १ | २ | ० | २ | 1 x FS - III | १ | २ | ०.७५ | ०.६० | १.३५ |
| ३ | तळेगाव-दाभाडे | पुणे | ब | १०.०० | ४२५७८ | १ | ० | १ | १ | ० | १ | 1 x FS - IV | १ | १ | ०.५० | ०.३० | ०.८० |
| ४ | सिल्लोड | औरंगाबाद | ब | १८.८४ | ४३८५९ | १ | ० | १ | १ | ० | १ | 1 x FS - IV | १ | १ | ०.५० | ०.३० | ०.८० |
| ५ | मलकापूर | बुलढाणा | ब | ५.१२ | ६१०१२ | १ | ० | १ | २ | ० | २ | 1 x FS - III | १ | २ | ०.७५ | ०.६० | १.३५ |
| ६ | चिखली | बुलढाणा | ब | ७.१० | ४८४२८ | १ | ० | १ | १ | ० | १ | 1 x FS - IV | १ | १ | ०.५० | ०.३० | ०.८० |
| ७ | वरोरा | चंद्रपूर | ब | ७.९२ | ४११७१ | १ | ० | १ | १ | ० | १ | 1 x FS - IV | १ | १ | ०.५० | ०.३० | ०.८० |
| ८ | भद्रावती | चंद्रपूर | ब | ३.३९ | ५६९०३ | १ | ० | १ | २ | ० | २ | 1 x FS - III | १ | २ | ०.७५ | ०.६० | १.३५ |
| | एकूण ब वर्ग | | | | | ८ | ० | ८ | ११ | ० | ११ | | ८ | ११ | ४.७५ | ३.३० | ८.०५ |

प्राथम्य - १ (रुपये कोटीमध्ये)

| | | | | | | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ९ | जव्हार | ठाणे | क | ३.५२ | ११२९८ | १ | ० | १ | १ | ० | १ | 1 x FS - IV | १ | १ | ०.५० | ०.३० | ०.८० |
| १० | .उरण | रायगड | क | २.१० | १२२५० | १ | ० | १ | १ | ० | १ | 1 x FS - IV | १ | १ | ०.५० | ०.३० | ०.८० |
| ११ | मुरुड-जंजिरा | रायगड | क | ३.०७ | ६०६३ | १ | ० | १ | १ | ० | १ | 1 x FS - IV | १ | १ | ०.५० | ०.३० | ०.८० |
| १२ | श्रीवर्धन | रायगड | क | ४.०४ | ७४०० | १ | ० | १ | १ | ० | १ | 1 x FS - IV | १ | १ | ०.५० | ०.३० | ०.८० |
| १३ | माथेरान | रायगड | क | ७.२० | २९७९ | १ | ० | १ | १ | ० | १ | 1 x FS - IV | १ | १ | ०.५० | ०.३० | ०.८० |
| १४ | पेण | रायगड | क | ९.८२ | १५८४४ | १ | ० | १ | १ | ० | १ | 1 x FS - IV | १ | १ | ०.५० | ०.३० | ०.८० |
| १५ | रोहा | रायगड | क | २०.७२ | ९८७१ | १ | ० | १ | १ | ० | १ | 1 x FS - IV | १ | १ | ०.५० | ०.३० | ०.८० |
| १६ | कर्जत | रायगड | क | ७.६४ | १३२०६ | १ | ० | १ | १ | ० | १ | 1 x FS - IV | १ | १ | ०.५० | ०.३० | ०.८० |
| १७ | त्र्यंबक | नाशिक | क | १.८९ | ९८०४ | १ | ० | १ | १ | ० | १ | 1 x FS - IV | १ | १ | ०.५० | ०.३० | ०.८० |
| १८ | भगूर | नाशिक | क | ०.६७ | १२४५७ | १ | ० | १ | १ | ० | १ | 1 x FS - IV | १ | १ | ०.५० | ०.३० | ०.८० |
| १९ | पाथर्डी | अहमदनगर | क | ४९.६५ | २२८२७ | १ | ० | १ | १ | ० | १ | 1 x FS - IV | १ | १ | ०.५० | ०.३० | ०.८० |
| २० | श्रीगोंदा | अहमदनगर | क | ८५.६५ | २६३२४ | १ | ० | १ | १ | ० | १ | 1 x FS - IV | १ | १ | ०.५० | ०.३० | ०.८० |
| २१ | भोर | पुणे | क | ८.३२ | १७८८६ | १ | ० | १ | १ | ० | १ | 1 x FS - IV | १ | १ | ०.५० | ०.३० | ०.८० |
| २२ | .आळंदी | पुणे | क | ६.८४ | १७५६५ | १ | ० | १ | १ | ० | १ | 1 x FS - IV | १ | १ | ०.५० | ०.३० | ०.८० |
| २३ | सासवड | पुणे | क | ६.४८ | २६६८९ | १ | ० | १ | १ | ० | १ | 1 x FS - IV | १ | १ | ०.५० | ०.३० | ०.८० |
| २४ | रहिमतपूर | सातारा | क | ३८.८८ | १६५५४ | १ | ० | १ | १ | ० | १ | 1 x FS - IV | १ | १ | ०.५० | ०.३० | ०.८० |
| २५ | म्हसवड | सातारा | क | ८८.१९ | २०५०० | १ | ० | १ | १ | ० | १ | 1 x FS - IV | १ | १ | ०.५० | ०.३० | ०.८० |
| २६ | महाबळेश्वर | सातारा | क | २०.०५ | १२७३७ | १ | ० | १ | १ | ० | १ | 1 x FS - IV | १ | १ | ०.५० | ०.३० | ०.८० |
| २७ | पाचगणी | सातारा | क | ६.८६ | १३२८० | १ | ० | १ | १ | ० | १ | 1 x FS - IV | १ | १ | ०.५० | ०.३० | ०.८० |
| २८ | सांगोला | सोलापूर | क | ६८.८२ | २८११६ | १ | ० | १ | १ | ० | १ | 1 x FS - IV | १ | १ | ०.५० | ०.३० | ०.८० |
| २९ | मंगळवेढा | सोलापूर | क | १.४८ | २१७०६ | १ | ० | १ | १ | ० | १ | 1 x FS - IV | १ | १ | ०.५० | ०.३० | ०.८० |
| ३० | मेंदर्गी | सोलापूर | क | १.९४ | १२१४८ | १ | ० | १ | १ | ० | १ | 1 x FS - IV | १ | १ | ०.५० | ०.३० | ०.८० |
| ३१ | दुधनी | सोलापूर | क | १.५८ | ११७५४ | १ | ० | १ | १ | ० | १ | 1 x FS - IV | १ | १ | ०.५० | ०.३० | ०.८० |

एचं- ५६४ -६अ

| | | | | | | | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ३२ | कुर्डुवाडी | सोलापूर | क | ६.४८ | २२७७७ | १ | ० | १ | १ | ० | १ | 1 x FS - IV | १ | १ | ०.५० | ०.३० | ०.८० |
| ३३ | मलकापूर | कोल्हापूर | क | १.९१ | ५५०४ | १ | ० | १ | १ | ० | १ | 1 x FS - IV | १ | १ | ०.५० | ०.३० | ०.८० |
| ३४ | मुरगूड | कोल्हापूर | क | २.०८ | ९२०४ | १ | ० | १ | १ | ० | १ | 1 x FS - IV | १ | १ | ०.५० | ०.३० | ०.८० |
| ३५ | पन्हाळा | कोल्हापूर | क | १.५० | ३४५२ | १ | ० | १ | १ | ० | १ | 1 x FS - IV | १ | १ | ०.५० | ०.३० | ०.८० |
| ३६ | वैजापूर | .औरंगाबाद | क | १०.५ | ३७००२ | १ | ० | १ | १ | ० | १ | 1 x FS - IV | १ | १ | ०.५० | ०.३० | ०.८० |
| ३७ | पैठण | .औरंगाबाद | क | ५.०८ | ३४५५६ | १ | ० | १ | १ | ० | १ | 1 x FS - IV | १ | १ | ०.५० | ०.३० | ०.८० |
| ३८ | गंगापूर | .औरंगाबाद | क | १०.४० | २२०५३ | १ | ० | १ | १ | ० | १ | 1 x FS - IV | १ | १ | ०.५० | ०.३० | ०.८० |
| ३९ | खुल्ताबाद | .औरंगाबाद | क | १६.३० | १२७९४ | १ | ० | १ | १ | ० | १ | 1 x FS - IV | १ | १ | ०.५० | ०.३० | ०.८० |
| ४० | कन्नड | .औरंगाबाद | क | १६.०० | ३४४०८ | १ | ० | १ | १ | ० | १ | 1 x FS - IV | १ | १ | ०.५० | ०.३० | ०.८० |
| ४१ | सोनपेठ | परभणी | क | ३.९० | १३०२२ | १ | ० | १ | १ | ० | १ | 1 x FS - IV | १ | १ | ०.५० | ०.३० | ०.८० |
| ४२ | पूर्णा | परभणी | क | १६.८१ | ३३२३१ | १ | ० | १ | १ | ० | १ | 1 x FS - IV | १ | १ | ०.५० | ०.३० | ०.८० |
| ४३ | मानवत | परभणी | क | ८.७० | २९२१८ | १ | ० | १ | १ | ० | १ | 1 x FS - IV | १ | १ | ०.५० | ०.३० | ०.८० |
| ४४ | सेलू | परभणी | क | ७१.७२ | ३९८५४ | १ | ० | १ | १ | ० | १ | 1 x FS - IV | १ | १ | ०.५० | ०.३० | ०.८० |
| ४५ | कळमनुरी | हिंगोली | क | ३१.१० | २०६२७ | १ | ० | १ | १ | ० | १ | 1 x FS - IV | १ | १ | ०.५० | ०.३० | ०.८० |
| ४६ | भोकरदन | जालना | क | २.५९ | १६९५० | १ | ० | १ | १ | ० | १ | 1 x FS - IV | १ | १ | ०.५० | ०.३० | ०.८० |
| ४७ | परतूर | जालना | क | ९.९७ | २९०१२ | १ | ० | १ | १ | ० | १ | 1 x FS - IV | १ | १ | ०.५० | ०.३० | ०.८० |
| ४८ | बिलोली | नांदेड | क | ११.६ | १३४३३ | १ | ० | १ | १ | ० | १ | 1 x FS - IV | १ | १ | ०.५० | ०.३० | ०.८० |
| ४९ | .उमरी | नांदेड | क | ८.३० | १११५१ | १ | ० | १ | १ | ० | १ | 1 x FS - IV | १ | १ | ०.५० | ०.३० | ०.८० |
| ५० | मुदखेड | नांदेड | क | १४.९ | १८७०० | १ | ० | १ | १ | ० | १ | 1 x FS - IV | १ | १ | ०.५० | ०.३० | ०.८० |
| ५१ | कंधार | नांदेड | क | ११.१ | २०७७२ | १ | ० | १ | १ | ० | १ | 1 x FS - IV | १ | १ | ०.५० | ०.३० | ०.८० |
| ५२ | हदगाव | नांदेड | क | २५.६७ | २३३३९ | १ | ० | १ | १ | ० | १ | 1 x FS - IV | १ | १ | ०.५० | ०.३० | ०.८० |
| ५३ | कुदलवाडी | नांदेड | क | २१.९९ | १४३३४ | १ | ० | १ | १ | ० | १ | 1 x FS - IV | १ | १ | ०.५० | ०.३० | ०.८० |
| ५४ | मुखेड | नांदेड | क | ३३.१० | २५९३३ | १ | ० | १ | १ | ० | १ | 1 x FS - IV | १ | १ | ०.५० | ०.३० | ०.८० |
| ५५ | .अहमदपूर | लातूर | क | १८.१ | ३५८०५ | १ | ० | १ | १ | ० | १ | 1 x FS - IV | १ | १ | ०.५० | ०.३० | ०.८० |
| ५६ | निलंगा | लातूर | क | २५.०४ | ३१६६२ | १ | ० | १ | १ | ० | १ | 1 x FS - IV | १ | १ | ०.५० | ०.३० | ०.८० |

| | | | | | | | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ५७ | .औसा | लातूर | क | ५.६६ | ३०८७६ | १ | ० | १ | १ | ० | १ | 1 x FS - IV | १ | १ | ०.५० | ०.३० | ०.८० |
| ५८ | भूम | .उस्मानाबाद | क | ४.६० | १७५०९ | १ | ० | १ | १ | ० | १ | 1 x FS - IV | १ | १ | ०.५० | ०.३० | ०.८० |
| ५९ | परांडा | .उस्मानाबाद | क | ४.५३ | १६९९० | १ | ० | १ | १ | ० | १ | 1 x FS - IV | १ | १ | ०.५० | ०.३० | ०.८० |
| ६० | मुरुम | .उस्मानाबाद | क | ३.५७ | १७२३७ | १ | ० | १ | १ | ० | १ | 1 x FS - IV | १ | १ | ०.५० | ०.३० | ०.८० |
| ६१ | नळदुर्ग | .उस्मानाबाद | क | ११.७ | १५९८९ | १ | ० | १ | १ | ० | १ | 1 x FS - IV | १ | १ | ०.५० | ०.३० | ०.८० |
| ६२ | गेवराई | बीड | क | ४.३० | २८४९२ | १ | ० | १ | १ | ० | १ | 1 x FS - IV | १ | १ | ०.५० | ०.३० | ०.८० |
| ६३ | किल्लेधारुर | बीड | क | ४.९४ | १८३३८ | १ | ० | १ | १ | ० | १ | 1 x FS - IV | १ | १ | ०.५० | ०.३० | ०.८० |
| ६४ | जळगाव-जामोद | बुलढाणा | क | ३.३५ | २६२८२ | १ | ० | १ | १ | ० | १ | 1 x FS - IV | १ | १ | ०.५० | ०.३० | ०.८० |
| ६५ | मेहकर | बुलढाणा | क | ५.४२ | ३७७१५ | १ | ० | १ | १ | ० | १ | 1 x FS - IV | १ | १ | ०.५० | ०.३० | ०.८० |
| ६६ | नांदुरा | बुलढाणा | क | ३.४४ | ३७४६९ | १ | ० | १ | १ | ० | १ | 1 x FS - IV | १ | १ | ०.५० | ०.३० | ०.८० |
| ६७ | देऊळगाव-राजा | बुलढाणा | क | ७.०० | २४३७२ | १ | ० | १ | १ | ० | १ | 1 x FS - IV | १ | १ | ०.५० | ०.३० | ०.८० |
| ६८ | लोणार | बुलढाणा | क | [illegible].६६ | २००८२ | १ | ० | १ | १ | ० | १ | 1 x FS - IV | १ | १ | ०.५० | ०.३० | ०.८० |
| ६९ | सिंदखेड राजा | बुलढाणा | क | २.२३ | १३९४१ | १ | ० | १ | १ | ० | १ | 1 x FS - IV | १ | १ | ०.५० | ०.३० | ०.८० |
| ७० | चांदूर रेल्वे | .अमरावती | क | २.६८ | १७७१९ | १ | ० | १ | १ | ० | १ | 1 x FS - IV | १ | १ | ०.५० | ०.३० | ०.८० |
| ७१ | शेंदुरजना | .अमरावती | क | १९.२४ | २१०८३ | १ | ० | १ | १ | ० | १ | 1 x FS - IV | १ | १ | ०.५० | ०.३० | ०.८० |
| ७२ | चिखलदरा | .अमरावती | क | ३.९४ | ४७११ | १ | ० | १ | १ | ० | १ | 1 x FS - IV | १ | १ | ०.५० | ०.३० | ०.८० |
| ७३ | दारव्हा | यवतमाळ | क | २.४३ | २३३६६ | १ | ० | १ | १ | ० | १ | 1 x FS - IV | १ | १ | ०.५० | ०.३० | ०.८० |
| ७४ | दिग्रस | यवतमाळ | क | २४.५६ | ३९१७८ | १ | ० | १ | १ | ० | १ | 1 x FS - IV | १ | १ | ०.५० | ०.३० | ०.८० |
| ७५ | पांढरकवडा | यवतमाळ | क | ३.९९ | २६५७२ | १ | ० | १ | १ | ० | १ | 1 x FS - IV | १ | १ | ०.५० | ०.३० | ०.८० |
| ७६ | रिसोड | वाशिम | क | ४.१४ | २७५१६ | १ | ० | १ | १ | ० | १ | 1 x FS - IV | १ | १ | ०.५० | ०.३० | ०.८० |
| ७७ | बाळापूर | .अकोला | क | १६.५० | ३९५०२ | १ | ० | १ | १ | ० | १ | 1 x FS - IV | १ | १ | ०.५० | ०.३० | ०.८० |
| ७८ | पातूर | .अकोला | क | ५.१८ | २०५३८ | १ | ० | १ | १ | ० | १ | 1 x FS - IV | १ | १ | ०.५० | ०.३० | ०.८० |
| ७९ | खापा | नागपूर | क | ३.०९ | १४९७२ | १ | ० | १ | १ | ० | १ | 1 x FS - IV | १ | १ | ०.५० | ०.३० | ०.८० |
| ८० | मोवाड | नागपूर | क | १.६७ | ८७३७ | १ | ० | १ | १ | ० | १ | 1 x FS - IV | १ | १ | ०.५० | ०.३० | ०.८० |
| ८१ | नरखेड | नागपूर | क | ३.९६ | २१५३७ | १ | ० | १ | १ | ० | १ | 1 x FS - IV | १ | १ | ०.५० | ०.३० | ०.८० |

